राज्य शासकीय कर्मचा-यांच्या राष्ट्रीय किंवा आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धांमधील सहभागामुळे होणा-या अनुपस्थितीच्या कालावधी नियमित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक: एलव्हीई १४९२/७६/सेवा-९,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३० जुलै, १९९२.

वाचा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: एलव्हीई-१४८५/प्र.क्र.८३३-अ/ सेवा-९, दिनांक ११ मे १९८९.

शासन निर्णय :- वर नमूद केलेल्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार राज्य शासकीय कर्मचारी खेळाडूंना राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय खेळ स्पर्धांमध्ये सहभागी होण्यास उत्तेजन देण्याच्या दृष्टीने काही विशेष सवलती मंजूर करण्यात आलेल्या असून त्यानुसार अशा कर्मचा-यांना राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय दर्जाच्या खेळ स्पर्धांमध्ये भाग घेऊन त्यात अति प्राविण्य दाखविल्याबद्दल विशेष वेतनवाढी अनुज्ञेय आहेत. केंद्रीय नागरी सेवा क्रीडा मंडळातर्फे [Central Civil Services Sports Board ] भरविल्या जाणा-या स्पर्धा ह्या या प्रयोजनासाठी राष्ट्रीय पातळीवरील स्पर्धा समजण्यांत याव्यात का व वरील शासन निर्णयातील सवलती अशा स्पर्धांमध्ये भाग घेणा-या खेळाडू कर्मचा-यांना याव्यात का असा या संदर्भात मुद्दा उपस्थित करण्यात आला होता.

या संबंधात केंद्र शासनाने असा खुलासा केला आहे की, केंद्रीय नागरी सेवा क्रीडा मंडळ हे देशातील सर्व क्रीडा महासंघटनांना संलग्न असून ती एक नोंदणी झालेली संस्था [ Registered Body ] आहे. या मंडळाने आयोजित केलेल्या "अखिल भारतीय नागरी सेवा स्पर्धांना" संबंधित क्रीडा महासंघटनांनी मान्यता देऊन राष्ट्रीय पातळी-वरील दर्जा दिलेला आहे. तसेच केंद्रीय नागरी सेवा क्रीडा मंडळ, नवी दिल्ली, यांनी अखिल भारतीय नागरी सेवा क्रीडा स्पर्धा या "अखिल भारतीय स्वरूपाच्या स्पर्धा" असल्याचेही स्पष्ट केले आहे. केंद्र शासनाचा हा खुलासा लक्षात घेता आता असे स्पष्ट करण्यात येते की, केंद्रीय नागरी सेवा क्रीडा मंडळाने आयोजित केलेल्या स्पर्धांमध्ये सहभागी होणारे शासकीय कर्मचारी हे शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: एलव्हीई-१४८५/ प्र.क्र.८३३-अ/सेवा-९, दिनांक ११ मे १९८९ च्या आदेशामध्ये उल्लेखिलेल्या सवलती मिळण्यास पात्र राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ना. कुलकर्णी,
शासनाचे उपसचिव.

प्रति,

[१] महालेखापाल, महाराष्ट्र-१, [लेखा व अनुज्ञेयता], मुंबई,
[२] महालेखापाल, महाराष्ट्र-२, [लेखा व अनुज्ञेयता], नागपूर,

[कृ.मा.प.]

शा.म.मु. रोटा/वि. वि. /एच-५४८[१०,००० +-१०-८-९२]

[३] महालेखापाल - १ व २ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
[४] महालेखापाल, [वैज्ञानिक व वाणिज्य], मुंबई,
[५] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
[६] संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
[७] निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
* [८] सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* [९] सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* [१०] प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* [११] प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांची कार्यालये, मुंबई,
* [१२] मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
[१३] मुख्य मंत्र्यांचे सचिव,
[१४] मंत्री व राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव,
[१५] राज्यपालांचे सचिव,
[१६] विभागीय आयुक्त, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/अमरावती,
[१७] सर्व मंत्रालयीन विभाग,
[१८] मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
[१९] विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
[२०] वित्त विभागातील सर्व कार्यासने,
[२१] सामान्य प्रशासन विभाग, [कार्यासन आठ],
[२२] समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग [कार्यासन क्रीयुसे-२],
[२३] निवड नस्ती - कार्यासन सेवा-९, वित्त विभाग.

---

* पत्राने.